**श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांच्याकडून शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या राज्यातील गरीब व गरजू जनतेला माफक दरामध्ये सकस आहार "शिवभोजन" उपलब्ध करुन देण्याच्या योजनेस रु. ५ कोटी इतका निधी एक विशेष बाब म्हणून देण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. एसव्हीटी-११२०/२०३/प्र.क्र.५६/का-१६.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- १९ मार्च, २०२०.

**<u>संदर्भ:</u>**- १) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक:- शाभोथ-२०१९/प्र.क्र.५१/नापु-१७,दि.०१.०१.२०२०

२) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा यांचे दि. १६.०१.२०२० चे पत्र.

३) कार्यकारी अधिकारी,श्री.सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, यांचे पत्र क्रं./सिविगमं/४५/२०२०,दि.२६.०२.२०२०

४) कार्यकारी अधिकारी श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास यांचे पत्र क्र.सिविगमं/७६/२०२०, दिनांक १३/३/२०२०

**<u>प्रस्तावना:-</u>**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या संदर्भांकित अ.क्र.१, दिनांक १/१/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील गरीब व गरजू लोकांची वर्दळ असेल त्या ठिकाणी १० रुपये प्रती थाळी भोजन उपलब्ध करुन देणारी "शिवभोजन योजना" अंमलात आलेली आहे. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा,मुंबई यांनी त्यांच्या संदर्भांकित अ.क्र.२ येथील दिनांक १६/१/२०२० रोजीच्या पत्रान्वये शिवभोजन ही शासनाची महात्वाकांक्षी योजना असून न्यासाची गरीब जनतेशी असलेली बांधिलकी लक्षात घेऊन "शिवभोजन"केंद्र सुरु करुन श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यासाने शासनाच्या या सामाजिक कार्यात सहभागी व्हावे, अशी विनंती केलेली आहे. न्यास व्यवस्थापन समितीच्या दि. १७.०२.२०२० रोजीच्या बैठकीत "शिवभोजन केंद्र " सुरु न करता सदर योजनेसाठी न्यासामार्फत रु. ५ कोटी इतका निधी "एक विशेष बाब " म्हणून उपलब्ध करुन दयावा, असे एकमताने ठरले. कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या संदर्भांकित अ.क्र.३ दिनांक २६/२/२०२० रोजीच्या पत्रान्वये सदर प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती केली होती. यानुषंगाने "शिवभोजन" योजनेस "एक विशेष बाब" म्हणून रुपये ५ कोटी इतका निधी न्यासामार्फत या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या दि.०१.०१.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील गरीब व गरजू जनतेला माफक दरामध्ये सकस आहार उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने "शिवभोजन"योजना राबविण्यात येणार आहे. सदर योजनेस श्रीसिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, (प्रभादेवी) मुंबई यांच्याकडून रु.५ कोटी इतका निधी "एक विशेष बाब" म्हणून उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या रकमेचा धनादेश "Accounts Officer Civil Supplies Mumbai (Axis Bank A/C no २३३०१०२००००००६४८)" यांच्या नावाने काढण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१९१७५७३३८५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2020.03.19 18:00:31 +05'30'

**( सुनिता साळुंके )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.अध्यक्ष, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास,प्रभादेवी, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.

३) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा,चर्चगेट, मुंबई-४०० ०२०.

४) अन्न व नागरी पुरवठा विभाग, (कार्या-नापु/१७),मंत्रालय, मुंबई.

५) कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास,प्रभादेवी, मुंबई.

६) निवड नस्ती / का.१६.